राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंर्तगत मंजूर प्रस्ताव- पुणे येथील मुळा-मुठा नदी संवर्धनांतर्गत कामे राबविण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रानकृ- २०१६/प्र.क्र.८८/भाग-२/तां.क.१
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०८ मार्च, २०१७

वाचा -

रानकृ- २०१६/प्र.क्र.८८/भाग-२/तां.क.१ दि. ०७ डिसेंबर, २०१६.

प्रस्तावना-

राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याच्या प्रस्तावासाठी केंद्र शासनामार्फत एकूण निधी रू.९९०.२६कोटी (अक्षरी रु. नऊशे नव्वद कोटी सव्वीस लक्ष) इतक्या रकमेच्या प्रस्तावास मंजुरी दिलेली आहे. एकूण मंजूर निधी (रू.९९०.२६ कोटी) पैकी केंद्र शासनाच्या ८५ टक्के (रू.८४१.७२ कोटी ) हिस्सा व पुणे महानगरपालिकेचा १५ टक्के हिस्सा (रु.१४८.५४ कोटी) समाविष्ट आहे. पुणे महानगरपालिकेस योजनेंतर्गत द्यावयाच्या निधीच्या अनुषंगाने केंद्र शासन हिश्श्यापैकी रू.४.९९ कोटी (अक्षरी रु. चार कोटी नव्याण्णव लक्ष) व रु. २१.०० कोटी (अक्षरी रु. एकवीस कोटी) निधी राज्य शासनास वितरीत करण्यात आलेला आहे. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या सूचनेनुसार दिनांक २९/११/२०१६ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत सदर प्रस्तावास मा.मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आलेली आहे. सबब, सदर प्रस्तावास केंद्रशासनामार्फ़त वितरित करण्यात आलेला निधी राज्य शासनामार्फ़त पुणे महानगरपालिकेस वितरित करण्याचीबाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासननिर्णय :-

राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याच्या प्रस्तावासाठी पुणे महानगरपालिकेस योजनेंतर्गत द्यावयाच्या निधीच्या अनुषंगाने केंद्र शासन हिश्श्यापैकी रू.४.९९ कोटी (अक्षरी रु. चार कोटी नव्याण्णव लक्ष) व रु. २१.०० कोटी (अक्षरी रु. एकवीस कोटी) असा एकूण रु. २५.९९ कोटी निधी राज्य शासनास वितरीत करण्यात आलेला आहे. सदर केंद्रशासनामार्फ़त वितरित करण्यात आलेला निधी एकूण रु. २५.९९ कोटी पुणे महानगरपालिकेस संदर्भाधीन दि. ७ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तींच्या तसेच केंद्र शासनामार्फ़त वेळोवेळी निर्गमित सूचनांच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे ( Commissioner, Pune Municipal corporation, Pune) यांचे नावे रू.२५,९९,००,०००/- ( अक्षरी रू.पंचवीस कोटी नव्व्याण्णव लक्ष फक्त) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

३. आयुक्त, पुणे महानगरपालिका यांना अदा करावयाची रू.२५.९९ कोटी एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागरातून काढून आयुक्त, पुणे महानगरपालिका यांना अदा करण्यासाठी आहारण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.गो.कड्डू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा.हजारी, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी आयुक्त, पुणे महानगरपालिका यांना रू. २५.९९ कोटी (अक्षरी रू.पंचवीस कोटी नव्याण्णव लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वंतत्र धनादेशाद्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी मागणी क्रमांक यू-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४,प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (०३) (०१) मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प (३४३५ १३६५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपरोक्त कार्यक्रमासाठी एकूण रु.२५.९९ कोटी एवढी तरतूद मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२०/अर्थ ७ दि. ०३ /०३/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ अन्वये खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकार, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आलेली आहे.
२. आयुक्त, पुणे महानगरपालिका यांस रु.२५.९९ कोटी (एकूण रुपये पंचवीस कोटी नव्याण्णव लक्ष फक्त) इतका निधी मंजूर व मुक्त करण्यास प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.
३. मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.
४. मागणी मागणी क्रमांक यू-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४,प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (०३) (०१) मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प (३४३५ १३६५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
५. आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचेकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे नाही.
६. तसेच परिच्छेदातील ६,७,८,९ या बाबी लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०३०७११०६४४७९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(वि.गो. कडू)
कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. विभागीय आयुक्त, पुणे
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, पुणे.
६. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधानसचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१५. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.